सार्वत्रिक लोकसभा निवडणुका-२०२४ च्या अनुषंगाने, महाराष्ट्र विकास सेवा मधील सहायक गट विकास अधिकारी, गट-ब संवर्गातील अधिकाऱ्यांच्या बदलीबाबत...

# महाराष्ट्र शासन

## ग्राम विकास विभाग

**शासन आदेश क्रमांकः** मविसे-११२४/प्र.क्र.४७/आस्था-३ अ

३ रा मजला, बांधकाम भवन, २५ मर्झबान पथ,
फोर्ट, मंत्रालय, मुंबई-०१
तारीख: १५ मार्च, २०२४

**वाचा :**

**ग्राम विकास विभाग, शासन आदेश क्रमांकः** मविसे-११२३/प्र.क्र.१६७/आस्था-३ अ, दिनांक ०४ मार्च, २०२४

**शासन आदेश :**

उपरोक्त वाचा मधील ग्राम विकास विभागाच्या दिनांक ०४ मार्च, २०२४ रोजीच्या आदेशान्वये, श्री.सुभाष ल. सावंत यांची सहायक गट विकास अधिकारी, पंचायत समिती, जावळी, जिल्हा सातारा या पदावर बदलीने पदस्थापना करण्यात आली होती.

०२. सार्वजनिक सेवेच्या हितार्थ महाराष्ट्र शासकीय कर्मचाऱ्यांच्या बदल्यांचे विनियमन आणि शासकीय कर्तव्य पार पाडताना होणाऱ्या विलंबास प्रतिबंध अधिनियम, २००५ मधील तरतूदींनुसार, उक्त अधिनियमाच्या कलम ४ (४) व ४ (५) मधील तरतूदी, नागरी सेवा मंडळाची शिफारस, बदली करण्यास सक्षम असलेल्या प्राधिकाऱ्यांच्या मान्यतेने व सार्वत्रिक लोकसभा निवडणुका-२०२४ च्या अनुषंगाने, श्री.सुभाष ल. सावंत, सहायक गट विकास अधिकारी यांच्या विनंतीनुसार, उक्त वाचा मधील ग्राम विकास विभागाच्या दिनांक ०४ मार्च, २०२४ रोजीच्या आदेशातील, त्यांच्या बदलीच्या पदस्थापनेत बदल करून त्यांना स्तंभ क्रमांक ४ मध्ये दर्शविलेल्या ठिकाणी बदलीने सुधारित पदस्थापना देण्यात येत आहे.

| अ. क्र. | अधिकाऱ्याचे नाव | दिनांक ०४ मार्च, २०२४ रोजीच्या आदेशान्वये बदली पदस्थापनेचे पद व ठिकाण | बदलीने सुधारित पदस्थापनेचे पद व ठिकाण | शेरा |
|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ |
| १ | श्री.सुभाष ल. सावंत, सहायक गट विकास अधिकारी | सहायक गट विकास अधिकारी, पंचायत समिती, जावळी, जिल्हा सातारा | सहायक गट विकास अधिकारी, पंचायत समिती, वाळवा, जिल्हा सांगली | रिक्त पदी |

०३. सदर आदेश तात्काळ अंमलात येत असून संबंधित अधिकारी यांनी पदस्थापना दर्शविण्यात आलेल्या पदावर तात्काळ रूजू व्हावे. तसेच संबंधित अधिकाऱ्यांनी अनधिकृत रजेवर जाऊ नये. संबंधित अधिकाऱ्यांचे लक्ष सामान्य प्रशासन विभागाच्या क्रमांक : सीडीआर १०८२/२५६७/२८/अकरा, दिनांक ३०.०८.१९८२ च्या शासन परिपत्रकाकडे वेधण्यात येत आहे. संबंधित अधिकाऱ्यांनी पदस्थापनेत बदल/नियुक्ती रद्द करण्यासाठी कुठल्याही स्वरूपाची आवेदने सादर केल्यास, सदर शासन परिपत्रकातील सूचनांनुसार ते शिस्तभंगाच्या कारवाईस पात्र ठरतील, याची त्यांनी नोंद घ्यावी.

०४. संबंधित विभागीय आयुक्त/मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद यांनी उपरोक्त अधिकाऱ्यांना त्यांच्या सध्याच्या पदभारातून तात्काळ कार्यमुक्त करावे व त्यांच्या नियुक्तीच्या जागी तात्काळ रूजू होण्यास सांगावे. संबंधित विभागीय आयुक्त/मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद यांनी संबंधित अधिकाऱ्यांना तात्काळ रूजू करून घ्यावे व अनुपालन अहवाल शासनास ई-मेलद्वारे सादर करावा.

सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२४०३१५२०३६५६०५२० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

DR.URMILA VAIBHAV JOSHI

Digitally signed by DR.URMILA VAIBHAV JOSHI
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=RURAL DEVELOPMENT DEPARTMENT, 2.5.4.20=0a6ce46aedb9acea34c72711d852d8e2e71e76603f9082ea9709649c6f45dc30, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=713D6BDDB988B05B1CC072EBFD3A58E7E640EA20499573AAE08DC106AC632ADD, cn=DR.URMILA VAIBHAV JOSHI
Date: 2024.03.15 21:30:44 +05'30'

**(डॉ. उर्मिला जोशी)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा.मुख्यमंत्री, महाराष्ट्र राज्य यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
२. मा.उप मुख्यमंत्री, महाराष्ट्र राज्य यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
३. मा.मंत्री (ग्रा.वि.), महाराष्ट्र राज्य यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
४. प्रधान सचिव (ग्रा.वि. व पं.रा.), ग्राम विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
५. महालेखापाल-१/२ (लेखा परीक्षा/ लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र मुंबई/नागपूर.
६. विभागीय आयुक्त, विभागीय आयुक्त कार्यालय, पुणे विभाग, पुणे.
७. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, कोल्हापूर, सातारा व सांगली.
८. जिल्हा कोषागार अधिकारी, जिल्हा कोल्हापूर, सातारा व सांगली.

९. संबंधित अधिकारी (संबंधित विभागीय आयुक्त/मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद यांचे मार्फत).

१०. अवर सचिव (आस्था-२), ग्राम विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.

११. निवड नस्ती, कार्यासन आस्था-३ अ, ग्राम विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.